सार्वजनिक आरोग्य विभागाच्या सनियंत्रणाखाली असलेल्या जिल्हा पाणी गुणवत्ता तपासणी प्रयोगशाळा व उप विभागीय प्रयोगशाळांमध्ये कार्यरत असलेले कंत्राटी मनुष्यबळ, साहित्य पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या सनियंत्रणाखाली घेणेबाबत...

महाराष्ट्र शासन

**पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः डब्ल्यूक्यूएम-२०१४/प्र.क्र. ०८/पापु-१२**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

तारीख: १८ डिसेंबर, २०१४

**वाचा -**

१) **शासन निर्णय क्रमांकः डब्ल्यूक्यूएम-२०१०/प्र.क्र.९५/पापु-१२, दिनांक ३ मार्च,२०१२,**

२) **शासन निर्णय डब्ल्यूक्यूएम-२०१२/प्र.क्र.१८८/पापु-१२, दिनांक २६ नोव्हेंबर,२०१२**

३) **शासन निर्णय क्रमांकः WSSD-१२०११(११)/६/२०१४-WSD(WS-१२), दि. १६ जून,२०१४**

**प्रस्तावना -**

सार्वजनिक आरोग्य विभागाच्या सनियंत्रणाखाली असलेल्या जिल्हा पाणी गुणवत्ता तपासणी प्रयोगशाळा व उप विभागीय प्रयोगशाळा, प्रयोगशाळेत कार्यरत असलेले कंत्राटी मनुष्यबळ, साहित्य पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या सनियंत्रणाखाली घेणेबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय -**

राष्ट्रीय पेयजल कार्यक्रमाच्या पाणी गुणवत्ता सनियंत्रण व सर्वेक्षण कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त होणाऱ्या ३% निधीतुन सार्वजनिक आरोग्य विभागाच्या सनियंत्रणाखाली असलेल्या जिल्हास्तरीय प्रयोगशाळांमध्ये कार्यरत असलेले कंत्राटी मनुष्यबळ (रसायनी व डेटा एंट्री ऑपरेटर) नेमणूक करण्यात आले आहे. दिनांक ३.३.२०१२ व दि. २६.११.२०१२ च्या शासन निर्णयानुसार राष्ट्रीय ग्रामीण पाणी गुणवत्ता सनियंत्रण व सर्वेक्षण कार्यक्रमांतर्गत राज्यात ग्रामीण रुग्णालयाच्या आवारात कार्यरत असलेल्या लघुप्रयोगशाळांचे बळकटीकरण करुन प्रत्येक जिल्हयात ३ ते ६ असे एकूण १३८ उप विभागीय प्रयोगशाळा कार्यरत करण्यात आल्या आहेत तसेच आता नव्याने आणखी १० लघु प्रयोगशाळांचे बळकटीकरण दि.१६.६.२०१४ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आले असल्यामुळे सद्य:स्थितीत ३४ जिल्हा आरोग्य प्रयोगशाळा व १४८ उप विभागीय प्रयोगशाळा कार्यरत आहेत.

पाणी गुणवत्ता प्रयोगशाळांच्या कामात सुसूत्रता येण्यासाठी व योग्य प्रकारे सनियंत्रण होण्यासाठी सार्वजनिक आरोग्य विभागाच्या सनियंत्रणाखाली असलेल्या ३४ जिल्हा प्रयोगशाळेतील कंत्राटी मनुष्यबळ (रसायनी व डेटा एंट्री ऑपरेटर),१३८ उप विभागीय प्रयोगशाळा, साहित्य, मनुष्यबळासह व नव्याने स्थापन होणाऱ्या १० उप विभागीय प्रयोगशाळांसाठी प्राप्त झालेल्या निधीसह पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या ताब्यात घेण्यास या आदेशान्वये मान्यता देण्यात येत आहे.

१३८ उप विभागीय प्रयोगशाळा कार्यरत आहेत त्याच ठिकाणी कार्यरत राहतील जागेच्या उपलब्धतेनंतर सदर प्रयोगशाळा स्थलांतरीत करण्यात येतील. याबाबतचे आदेश स्वतंत्ररित्या निर्गमित करण्यात येतील. सदर प्रयोगशाळा संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांनी ताब्यात घेऊन त्यांचे व्यवस्थापन व नियंत्रण करावे.

पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने सार्वजनिक आरोग्य विभागास वितरीत केलेला परंतु खर्च न झालेला निधी या विभागास परत करावा. हे आदेश तात्काळ दि.१ जानेवारी, २०१५ पासून अंमलात येतील. हे आदेश सार्वजनिक आरोग्य विभागाच्या सहमतीने व त्यांचा अनौ. संदर्भ क्रमांक: ७/२०१४, कार्यासन क्रमांक: आरोग्य-३अ, दिनांक ०९.१२.२०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२१८११०७३५००२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Garud Nandkishor M

Digitally signed by Garud Nandkishor M
DN: CN = Garud Nandkishor M, C = IN, S = Maharashtra, O = Govt. of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2014.12.18 16:10:01 +05'30'

**(नंदकिशोर गरुड)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
२) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
३) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
४) प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.०३२ ४००-
५) उप सचिव व संचालक (आर. एस. पी. एम. यू.), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

६) विभागीय आयुक्त (सर्व)
७) जिल्हाधिकारी (सर्व)
८) संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
९) मुख्य कार्यकारी अधिकारी ,जिल्हा परिषद (सर्व)
१०) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर, नरीमन पॉईट, मुंबई.
११) संचालक, पाणी गुणवत्ता व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापूर, नवी मुंबई.
१२) संचालक आरोग्य, आरोग्यसेवा संचालनालय, मुंबई.
१३) उप संचालक, राज्य आरोग्य प्रयोगशाळा, पुणे.
१४) मुख्य अभियंता, राज्यस्तरीय भारत निर्माण कक्ष, बेलापूर, नवी मुंबई.
१५) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर
१६) अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई.
१७) जिल्हा कोषाधिकारी (सर्व)
१८) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
१९) गट विकास अधिकारी, पंचायत समिती (सर्व)
२०) सर्व कार्यासने पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१) निवड नस्ती पापु-१२.